**<u>महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान</u>**
**नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडणी व वैयक्तिक शौचालय सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क.नादव-२०१०/प्र.क्र.२१९/पापु-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २५ जून,२०१०**

**संदर्भ :** (१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नादपि-२००४/प्र.क्र.२८/पापु-२२ दि.२५.८.२००६
(२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नापापु२००८/प्र.क्र.१/पापु२२, दि.२२ ऑक्टोबर, २००८
(३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नापापु२००८/प्र.क्र.१९८/पापु२२, दि.२३ डिसेंबर, २००८

**प्रस्तावना :**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या पाणी पुरवठा योजनांना त्यांच्या वर्गवारीनुसार अनुदान देण्यात येते. नागरी भागातील दलित वस्त्यामध्ये सुध्दा पिण्याच्या पाण्यासाठी विशेष भर देण्याची गरज लक्षात घेवून संदर्भांकित दि.२५ ऑगस्ट,२००६ च्या शासन निर्णयान्वये नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत नागरी भागातील दलित वस्त्यांमध्ये पिण्याच्या पाण्याच्या उंच टाक्या, पंप बदलणे, पाऊस पाणी संकलन, वितरण व्यवस्था इ. कामे घेण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या वर्गवारीनुसार अनुज्ञेय अनुदान देण्यात येते.

२. केंद्र शासन व राज्य शासनाच्या कमी खर्चाच्या शौचालय बांधकाम कार्यक्रमांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले. तथापी सर्वाना शौचालय उपलब्ध करुन देण्याचे उद्दिष्ट साध्य होवू शकले नसल्याने नागरी भागात शौचालयाची व्याप्ती मर्यादित आहे. त्यातही नागरी भागातील अनुसूचित जातीं व नवबौध्द घटकांमधील कुटुंबाकडे वैयक्तिक शौचालयाची उपलब्धता कमी आहे. नागरी क्षेत्रामध्ये सार्वजनिक शौचालयाची उपलब्धता पर्याप्त प्रमाणात नसल्याने उघडयावर शौचविधीस बसण्याची प्रथा सुरु आहे. अशा परिस्थितीमुळे बहूतांश नागरी भागामध्ये स्वच्छता व आरोग्याचे प्रश्न निर्माण होत आहेत.

३.	महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. यामध्ये नागरी भागातील पाणी पुरवठा, मलनिःसारण, शौचालय आणि घनकचरा व्यवस्थापन क्षेत्रामध्ये अस्तित्वातील सुविधामध्ये दुरुस्ती करुन या सेवांची व्याप्ती व गुणवत्ता वाढविण्यासाठी विविध सुधारणा अंमलात आणण्याचे उद्दिष्ट् निश्चित केलेले आहे. महाराष्ट्र राज्य सुजल व निर्मल करावयाचे असल्यामुळे राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळजोडण्या व वैयक्तिक शौचालयाच्या सुविधा उपलब्ध करुन देणे अत्यंत गरजेचे आहे.

४.	त्या अनुषंगाने नागरी भागातील अनुसूचित जातीं व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळजोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी विशेष योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील नागरी भागातील अनुसूचित जातीं व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळजोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी **महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजना** राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२.	महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळजोडण्या व वैयक्तिक शौचालय बांधण्यासाठी नागरी स्थानिक संस्थांना अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल.

३.	या योजनेंतर्गत नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळजोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी प्रकल्प किंमतीच्या ९०% शासकीय अनुदान अनुज्ञेय राहील तर, १०% रक्कम संबधित लाभार्थी किंवा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी उपलब्ध करुन द्यावी. या योजनेखाली नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या शहरातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी प्रस्ताव तयार करुन शासनास सादर करावा.

४.	महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी खाजगी नळ जोडण्यासाठी रु.४०००/- प्रतिकुटुंब तर वैयक्तिक शौचालय बांधकामासाठी रु.१२०००/- प्रतिकुटुंब या प्रमाणे अंदाजपत्रक तयार करण्यात यावे.

५.	या योजनेअंतर्गत नागरी अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील लाभार्थीचा प्राधान्यक्रम निश्चित करतांना शहरातील दलित वस्तीमधील दारिद्ररेषेखालील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुंटुब, इतर अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंब व इतर भागात निवास करणारे अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंब याप्रमाणे करण्यात यावा. पंरतू प्रकल्प प्रस्ताव तयार करतांना या सर्व अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना समाविष्ट करण्यात यावे. या योजनेअंतर्गत खाजगी विकासकांना निवासी प्रकल्पासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधांसाठी अनुदान अनुज्ञेय होणार नाही.

६.	महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत प्रकल्प प्रस्ताव तयार करताना नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांचे सर्वेक्षण करुन त्या माहितीच्या आधारे या कुटुंबाकडे खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय यांच्या उपलब्धतेची तपासणी करावी. ज्या कुटुबांकडे खाजगी नळ जोडणी आहे, परंतू वैयक्तिक शौचालय नाहीत किंवा वैयक्तिक शौचालय आहेत, परंतू खाजगी नळ जोडणी नाही, तसेच, ज्या कुटुंबियांकडे खाजगी नळ जोडणी व वैयक्तिक शौचालय या दोन्ही सुविधा उपलब्ध नाहीत अशा कुटुंबियांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी वरील परिच्छेद-४ नुसार विहित केलेल्या दरडोई किंमतीच्या आधारे प्रकल्प प्रस्ताव तयार करण्यात यावा. सदर प्रस्ताव सादर करताना नागरी अनुसूचित जातीं व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांकडे नळजोडणी व शौचालय सुविधेबाबतची उपलब्धता इ. बाबतचे विवरण ग्राहक सर्वेक्षणाचे आधारे भरुन प्रकल्प प्रस्ताव पाठविणे क्रमप्राप्त राहील. सदर माहितीचे विवरण **परिशिष्ट-१** मध्ये जोडलेले आहे.

७.	महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कंटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालयाचे प्रकल्प प्रस्ताव तयार करण्यासाठी सर्वेक्षण, प्राकलन व आराखडे तयार करण्यासाठी येणारा खर्च योजनेच्या एकुण किंमतीमध्ये समाविष्ट करता येईल.

८.	नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्याच्या योजनेंतर्गत खालील प्रमाणे कामे करता येतील :-

अ) दलित वस्तीसाठी स्वतंत्र पिण्याच्या पाण्याची टाकी/साठवण टाकी बांधणे.
ब) दलित वस्तीसाठी वितरण वाहिनी तसेच खाजगी नळजोडणी देण्यासाठी सर्व्हिस कनेक्शन, बल्क तसचे ग्राहक जलमापके बसविणे.
क) दलित वस्तीपर्यंत पाणी आणण्यासाठी आवश्यक यंत्र सामुग्री (मोटार, पंप) तसेच विंधण विहिर घेणे

ड) अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना वैयक्तिक शौचालय बांधकामासाठी आवश्यक सामुग्री, त्यामध्ये सेप्टीक टँक तसेच, सेप्टीक टँक पासून भुयारी गटार व्यवस्थेपर्यंत जोडणी देणे. या अंतर्गत दोन खड्डयाची (Two pit pour flush) अथवा स्थानिक परिस्थिती अनुरुप शौचालये बांधता येतील.

इ) जागे अभावी अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना वैयक्तिक नळ जोडणी देणे शक्य नसल्यास काही कुटुंबांना गट नळजोडणी देणे.

ई) त्याचबरोबर जागे अभावी अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना वैयक्तिक शौचालय बांधकाम करणे शक्य नसेल अशा ठिकाणी सामुदायिक शौचालय (आवश्यक त्या युनिटसह) उपलब्ध करुन देणे, अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियासाठी बांधण्यात आलेल्या सामुदायिक शौचालयावर पाऊसपाणी संकलन संच बसवून पाणी उपलब्ध करुन देणे तसेच तेथील विजेसाठी सौर उर्जेचे आवश्यक संच बसविणे.

उ) अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियासाठी खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्याकरिता प्रकल्प प्रस्ताव तयार करण्यासाठी प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार शुल्क अनुज्ञेय राहील.

९. या योजनेअंर्गत जागे अभावी अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना वैयक्तिक शौचालय बांधकाम करणे शक्य नसेल अशा ठिकाणी सामुदायिक शौचालय बांधण्यासाठी जागा संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

१०. अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कंटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या देण्यासंदर्भात प्राकलने व आराखडे तयार करतांना परिच्छेद क्र. ४ मध्ये नमुद केल्यानुसार प्रती कुटुंब खर्चानुसार परिगणना करावयाची आहे. पंरतु, दलित वस्तीमध्ये वितरण व्यवस्था , पाण्याची उंच टाकी किंवा पाणी त्या वस्तीपर्यंत आणण्यासाठी पंप किवा मोटर्स नसल्यास या बाबी अंदाजपत्रकात समाविष्ट करता येतील.

११. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कंटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी लाभार्थी अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील असल्याची तपासणी करुन त्याबाबतची आवश्यक ती खात्री नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी करावी. सविस्तर प्रकल्प प्रस्तावामध्ये समाविष्ट सर्व कुंटुब अनुसूचित जातीचे असल्याचे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने प्रमाणीत करणे आवश्यक राहील.

१२. केंद्र पुरस्कृत कमी खर्चाच्या शौचालय बांधकाम कार्यक्रमांतर्गत आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील नागरिकांना वैयक्तिक शौचालयासाठी अनुदान अनुज्ञेय आहे. या कार्यक्रमांतर्गत ज्या शहराचे प्रस्ताव मंजूर आहेत त्यातील अंतर्भूत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियासाठी या योजनेतून अनुदान अनुज्ञेय राहाणार नाही.

१३.      नागरी दलीत वस्ती पाणी पुरवठा योजनेअंतर्गत संदर्भीय दिनांक २५/८/२००६ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार विहीत कार्यपध्दती अवलंबून जिल्हाधिकाऱ्यांच्या शिफारशीने शासनाकडे पाठविण्यात येणाऱ्या प्रस्तावातील उपांगांचा समावेश नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेअंतर्गत पाठविण्यात येणाऱ्या प्रस्तावांमध्ये केल्यास त्या उपांगांकरिता या योजनेतून अनुदान अनुज्ञेय राहाणार नाही.

१४.      महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी या योजनेतंर्गत सहभागी होणे, प्रकल्प प्रस्ताव तयार करणे, योजनेसाठी अनुज्ञेय आर्थिक सहभाग भरणे, स्वतंत्र बॅक खाते उघडणे इत्यादीचा ठराव नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करावा.

१५.   महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करण्यासाठी या योजनेसाठी राष्ट्रीयकृत बॅकेत स्वंतंत्र खाते उघडण्यात यावे. या योजनेपोटी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सहभागाची रक्कम जमा करण्यात यावी. सदर रक्कम जमा केल्याचे शासनास कळविल्यानंतर शासकीय अनुदान संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस उपलब्ध करुन देण्यात येईल.

१६.      या योजनेंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय अनुदान दोन समान हप्त्यांमध्ये वितरीत करण्यात येईल. त्या अनुषंगाने, नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या आर्थिक सहभागाची रक्कम दोन हप्त्यामध्ये स्वंतंत्र बॅक खात्यामध्ये जमा करावी. ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्था त्यांचा आर्थिक सहभाग दोन हप्त्यामध्ये न भरता अधिक हप्त्यामध्ये भरतील, अशा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांनी भरलेल्या आर्थिक सहभागाच्या अनुरुप अनुज्ञेय अनुदान वितरीत करण्यात येईल.

१७.   महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत प्रकल्प प्रस्ताव शासनास सादर करतांना खालील बाबी अंतर्भूत कराव्यात :-

१. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजना घेण्याबाबत वरील परिच्छेद क्र.१४ नुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा ठराव.

२. अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील सविस्तर प्रकल्प प्रस्ताव.

३. सविस्तर प्रकल्प प्रस्तावामध्ये समाविष्ट असलेली सर्व कुंटुबे अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील असल्याची नागरी संस्थेची प्रमाणीत प्रत.

४. शासन निर्णयातील परिशिष्ट-१ मधील माहितीचे विवरण.

५. या योजनेसाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्था स्वःहिस्सा कसा उभारणार याचे नियोजन.

१८.  महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकडून प्राप्त होणारे प्रकल्प प्रस्ताव संदर्भाकित दि. २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानासाठी स्थापन केलेल्या राज्यस्तरीय समितीस मान्यतेसाठी सादर करण्यात येतील. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत नागरी संस्थांच्या प्रस्तावांना मान्यता देण्यासंदर्भात आयोजित राज्यस्तरीय समितीच्या बैठकीसाठी प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी यांना राज्यस्तरीय समितीचे सदस्य म्हणून समाविष्ट करण्यात येत असून **राज्यस्तरीय समितीची रचना** खालीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| **१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई** | - | **अध्यक्ष** |
| २. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ४. सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ५. सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ६.आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई | - | सदस्य |
| ७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई | - | सदस्य |
| ८. उप सचिव/सह सचिव (नागरी धोरण), पा.पु.व स्व.वि, मंत्रालय, मुंबई | - | **सदस्य सचिव** |

१९.  महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत आर्थिक व भौतिक प्रगतीचा आढावा या राज्यस्तरीय समितीमार्फत घेण्यात येईल. या योजनेंतर्गत मंजूरी प्राप्त होणाऱ्या नागरी संस्थांनी योजनेच्या कामाचा व्दिमासिक अहवाल शासनास सादर करावा.

२०.  शासन निर्णयामधील सूचनांच्या अनुषंगाने महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत परिपूर्ण प्रस्ताव नागरी क्षेत्र सुधारणा कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नविन प्रशासकीय भवन, ३ रा मजला, यांच्याकडे सादर करण्यात यावा.

२१.  सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक **संकेतांक २०१००६२५२०१००००१ असा आहे.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( ल.गो.ढोके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२. मा.मंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
४. सर्व मा.विधीमंडळ सदस्य,
५. महापौर, सर्व महानगरपालिका
६. महालेखापाल-१ मुंबई
७. महालेखापाल-२ नागपूर
८. विभागीय आयुक्त ( सर्व ) महसूली विभाग
९. आयुक्त, सर्व महानगरपालिका
१०. पोलीस आयुक्त ( सर्व )
११. जिल्हाधिकारी (सर्व)
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
१४. जिल्हा पोलीस अधिक्षक, सर्व जिल्हे
१५. अध्यक्ष, सर्व नगरपरिषदा.
१६. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई
१७. संचालक, समाज कल्याण संचालनालय, मुंबई
१८. संचालक, लेखाकोषागार, मुंबई.
१९. उपआयुक्त, नगरपालिका प्रशासन कक्ष, विभागीय आयुक्त ( सर्व ) महसूली विभाग
२०. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
२१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (सर्व)
२२. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व )
२३. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (सर्व)
२४. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ( सर्व )
२५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (सर्व)
२६. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व )
२७. विभागीय समाज कल्याण अधिकारी (सर्व)
२८. मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका
२९. विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी (सर्व)
३०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३१. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालये ( सर्व जिल्हे )
३२. सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपरिषद प्रशासन , जिल्हाधिकारी कार्यालये ( सर्व जिल्हे)
३३. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३४. सर्व सहसचिव/ उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी , पा.पु.व स्व.वि., मंत्रालय,मुंबई
३५. निवडनस्ती पापु-२२